**कुर्ला, मुंबई येथील नेहरुनगर एस.टी. डेपो येथे ऑटोमोटीव्ह रिसर्च असोसिएशन ऑफ इंडीया, पुणे (ARAI, Pune) यांचेमार्फत वाहन निरीक्षण आणि परिक्षण केंद्र (Inspection and Certification Centre) स्थापन करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१०१८/प्र.क्र.२२०/परि-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २२ जानेवारी २०१९

वाचा : -

१) मा. उच्च न्यायालयात दाखल जनहित याचिका क्र. २८/२०१३ मधील मा. न्यायालयाचे दि. १८.०२.२०१६ रोजीचे आदेश
२) महाव्यवस्थापक, ऑटोमोटीव्ह रिसर्च असोसिएशन ऑफ इंडीया,पुणे यांचा दि.०३.१०.२०१८ रोजीचा ई-मेल
३) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,मुंबई यांचे पत्र क्र. राप/ स्थाअ/स्थावर/उ.व व्य. सं./५९३५, दि.२९.११.२०१८
४) परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.पीआयएल२८/२०१८/१०१८/न.क्र.४(३)/ जा.क्र.१४७१७, दि. १५.१०.२०१८ व जा. क्र.१६६८५ दि.०७.१२.२०१८

प्रस्तावना : -

मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी जनहित याचिका क्र.२८/२०१३ (श्रीकांत कर्वे वि.महाराष्ट्र शासन) मध्ये दि.१८.०२.२०१६ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सर्व परिवहन कार्यालयास वाहन तपासणीसाठी २५० मीटर लांबीचा ब्रेक टेस्ट ट्रॅक असणे आवश्यक आहे. मा. उच्च न्यायालयाच्या सदर आदेशानुसार मुंबई शहर व उपनगरामधील विविध प्रादेशिक परिवहन कार्यालयांसाठी ब्रेक टेस्ट ट्रॅक उपलब्ध करुन देण्याबाबत कार्यवाही सुरु आहे. तथापि, मुंबई शहर व उप नगरातील वाहन संख्या विचारात घेता मुंबई मध्ये वाहन निरीक्षण व परिक्षण केंद्र ( Inspection and Certification Centre) स्थापन करणे आवश्यक आहे.

उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांनी दि.२९.११.२०१८ रोजीच्या पत्रान्वये उपरोक्त प्रयोजनासाठी महामंडळाच्या मालकीची ६१३८ चौ. मी. जागा उपलब्ध करुन देण्याबाबत ना-हरकत प्रमाणपत्र दिले आहे. त्यानुषंगाने सदर जागेवर ऑटोमोटीव्ह रिसर्च असोसिएशन ऑफ इंडीया,पुणे या केंद्रीय मोटार वाहन नियम, १९८९ च्या नियम १२६ अंतर्गत मान्यता प्राप्त संस्थेमार्फत वाहन निरीक्षण व परिक्षण केंद्र (Inspection and Certification Centre) स्थापन करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुंबई मधील कुर्ला, नेहरुनगर येथील महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या जागेवर ऑटोमोटीव्ह रिसर्च असोसिएशन ऑफ इंडीया,पुणे या संस्थेमार्फत वाहन निरीक्षण व परिक्षण केंद्र (Inspection and Certification Centre) स्थापन करण्यास रु.१४,००,००,०००/- (रुपये चौदा कोटी फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. त्याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे:-

| Sr. No. | Particulars | Amount (Rs. In Lakhs) |
|---|---|---|
| 1 | Creating suitable building and infrastructure at the site for 4 lane operation | 450.00 |
| 2 | Equipment for four lanes with two years warranty and five years AMC (Comprehensive) | 360.00 |
| 3 | Utility Cost (DG sets, Compressor, furniture, air-condition, etc) | 92.00 |
| 4 | Lane Management software including connectivity of test centre to department data base | 130.00 |
| 5 | Project Management fees | 75.00 |
| 6 | Operation Cost | 250.00 |
| 7 | Garage Auditing (approx. 25 nos around the test Centre) | 25.00 |
| 8 | Six audit during operation (2 years) of the Centre | 18.00 |
| | **Total** | **1400.00** |

२. उपरोक्त मान्यता ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

i) प्रस्तुत वाहन निरीक्षण आणि परिक्षण केंद्र (Inspection and Certification Centre) हे महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांचे जागेवर उभारण्यात यावे.

ii) प्रस्तुत वाहन निरीक्षण आणि परिक्षण केंद्र (Inspection and Certification Centre) हे महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ व परिवहन विभाग यांचे संयुक्त भागीदारीत उभारण्यात यावे.

iii) प्रस्तुत केंद्राच्या देखभालीची जबाबदारी महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाची असेल.

iv) प्रस्तुत केंद्राद्वारे प्राप्त होणाऱ्या महसूलाचा हिस्सा उभयंताना मान्य असलेल्या अटीं व शर्तींनुसार निश्चित करण्यात यावा.

v) प्रस्तुत केंद्र स्थापन करणेबाबतऑटोमोटीव्ह रिसर्च असोसिएशन ऑफ इंडीया,पुणे यांनी तयार केलेल्या निविदा प्रपत्राप्रमाणे यंत्रसामग्री बसविण्याबाबतची निविदा कार्यवाही महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळमार्फत करण्यात यावी.

vi) प्रस्तुत केंद्र चालविण्यासाठी ऑटोमोटीव्ह रिसर्च असोसिएशन ऑफ इंडीया, पुणे यांचेमार्फत सेवापुरवठादाराची २ वर्षांकरीता नेमणुक करण्यात येईल. मात्र योग्यता प्रमाणपत्र जारी करण्याचे कामकाज मोटार वाहन विभागातील मोटार वाहन निरीक्षक/सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक करतील. सदरहू केंद्र चालविण्याचे प्रशिक्षण सेवापुरवठादाराने प्रस्तुत २ वर्षांच्या कालावधीत करावे.

३. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र. बी-३, मुख्य लेखाशीर्ष-२०४१ वाहनांवरील कर, (०१)(०६) वाहन चालविण्यासाठी चाचणी घेताना गुणात्मक वाढ करण्याकरीता पायाभूत सोयीमध्ये दर्जावाढ करणे, कृत्रीम चाचणी पथ बांधणे (कार्यक्रम) (२०४१ ०३२१) १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०१८-२०१९ या आर्थीक वर्षाकरीता केलेल्या तरतुदींमधून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२६४/१४६१, दि.०५.०१.२०१९ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१८/२०१९/व्यय-८, दि.११.०१.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२२१५२३१३०७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM
DATTATRAY
HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2019.01.22 15:25:05 +05'30'

**(द.ह. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. उप सचिव (१४६१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सह सचिव (व्यय-८), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११. कक्ष अधिकारी/अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती- (परि-४).